(1)

**महिला व बाल विकास विभागांतर्गत जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील जिल्हास्तरावरील विविध समित्या एकत्रित करुन पुर्नरचित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण- २०११/प्र.क्र.२६/का-२,
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २ नोव्हेंबर, २०११

**वाचा :-** आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. मबाविआ/समिती/एकत्रिकरण/२०१०-११/का-६/७६६२, दिनांक २०.११.२०१० व क्र.मबाविआ/समिती/एकत्रिकरण/२०१०-११ /का-६/२७५८, दिनांक ६.८.२०११

**प्रस्तावना :-** महिलांच्या संरक्षणासाठी हुंडा निर्मुलन, कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण, देवदासी प्रथा निर्मुलन, अनैतिक व्यापार (प्रतिबंध) या सारख्या सामाजिक कायदयाच्या आणि महिला धोरणाच्या प्रभावी अंमलबजावणीकरिता जिल्हास्तरावर अधिनियमातील तरतुदींच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समित्या स्थापन करण्यात आलेल्या आहेत. या समित्या गठीत करण्यात आल्याबाबतचे शासन निर्णय व या समित्यांची रचना व कार्य खालील तपशीलात दर्शविल्याप्रमाणे आहे.

| अक्र | शासन निर्णय /पत्र व समितीचे नांव | अध्यक्ष | सदस्य सचिव | समिती सदस्य | समितीचे कार्ये |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | अ) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडाव पर्यटन विभाग, क्र. डीपीए-१०८३/८०५१९ /सीए-३, दि.२९ जानेवारी, १९८५ (हुंडा पध्दती नष्ट करण्यासाठी जिल्हा दक्षता समिती)<br><br>ब) शासन निर्ण य समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व सहाय्य विभाग क्र.डीपीए-१०४७/९४६९/(३७२३)/ सुधार-३, द.४.११.१९८७ | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) पोलीस अधिक्षक<br>२) शा. महिला संस्था<br>३) जि.समाज कल्याण अधिकारी<br>४) कायदेतज्ञ<br>५) महिला महाविदयालय<br>६) वैदयकीय धिकारी<br>७) सामाजिक कार्यकर्ता<br>८) महिला संस्थांचे प्रतिनिधी<br>९) स्थानिक महिला आमदार किंवा खासदार<br>१०) पोलीस सामाजिक सुरक्षा कक्षातील एक महिला | हुंडा पध्दती निर्मुलनाबाबत जनजागृती, हुंडा विरोधी कार्यक्रम, अत्याचार पिडीत प्रकरणांची चौकशी, पिडित महिलांचे पुनर्वसन, कायदेविषयक मदत, अनिष्ठ प्रथेने पिडीत महिलांना सहाय्य |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र. आयटीपए-२००५/ प्र.क्र.२६४/ का.३, दि. २०.९.२००६<br><br>(अनैतिक व्यापार प्रतिबंध करण्यासाठी जिल्हास्तरीय सल्लागार समिती) | पोलिस अधिक्षक /पोलिस उप आयुक्त | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा कामगार कल्याण अधिकारी जिल्हा आरोग्य अधिकारी जिल्हा शिक्षण अधिकारी जिल्हा समाजकल्याण अधिकारी जिल्हा सरकारी वकील जिल्हा शल्यचिकित्सक माविम प्रतिनिधी बाल कल्याण समिती सदस्य स्वयंसेंवी संस्थांचे प्रतिनिधी बालमजूर क्षेत्रातील संस्था प्रतिनिधी | अनैतिक व्यापारात बळी पडणा-या महिला मुलींची संख्या कमी करण्यासाठी उपाय योजना, अनैतिक व्यापारातून सुटका केलेल्या महिला व मुलींच्या पुर्नवसनासाठी कार्यक्रम आखणे, जिल्हयातील घडांमोडीवर लक्ष ठेवणे |
| ३. | शासन निर्णय महिला व बाल विकास, क्र. मसके-२००७/ प्र.क्र. २३६/ का-२, दि.१३ फेब्रुवारी, २००८<br>(कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण अधिनियम २००५ त्रिस्तरीय समिती) | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) जिल्हा पोलीस अधिक्षक<br>२) मुख्य कार्यकारी अधिकारी<br>३) जिल्हा शल्य चिकित्सक<br>४) जिल्हा आरोग्य अधिकारी<br>५) (प्रांत अधिकारी<br>६) जिल्हा स्तरीय मोफत कायदेविषयक समिती प्रतिनिधी<br>७) सभापती महिला व बाल विकास समिती<br>८) स्थानिक महिला संघटनांचे प्रतिनिधी<br>९) बार असोसिएशनचे प्रतिनिधी | कौटुंबिक हिंसाचाराबाबत नोंद झालेल्या घटनांची व कार्यवाहीची माहिति संकलीत करणे उपविभागीय समितीस मार्गदर्शन करणे, कायदयाबाबत जनजागृति करणे |
| ४. | शासन निर्णय महिला व बाल विकास, क्र. संकीर्ण -२००६/ प्र.क्र. १९५/ का-२, दि. ३० ऑगस्ट, २००६<br>(महिलांसंबधी धोरण व हुंडा प्रतिबंध कायदयासंदर्भात सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशाची अंमलबजावणी करण्याकरीता जिल्हा पातळीवर समिती) | जिल्हाधिकारी | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | १) सभापती महिला व बाल कल्याण समिती<br>२) महिला नगरसेविका<br>३) समाजिक संस्था महिला प्रतिनिधी<br>४) मुख्य कार्यकारी अधिकारी | महिला संबंधी धोरण व हुंडा प्रतिबंधक कायद्यासंदर्भात सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशाची अंमलबजावणी जिल्हा पातळीवर करणे. |

(३)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५. | शासन निर्णय महिला व बाल विकास, क्र. ममघो -२००१/ प्र.क्र. ९६/ का-१०, दि.१८ जानेवारी, २००२<br><br>(महिला धोरण - २००१, महिला सक्षमीकरण समिती / महिला सक्षमीकरण कृतीदल जिल्हा महिला सक्षमीकरण समिती) | जिल्हाधिकारी | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | १) जिल्हा पोलीस प्रमुख<br>२) अध्यक्ष महिला व बाल विकास समिती<br>३) नगरपरिषद महानगरपालिका<br>४) जिल्हा लीड बँक ऑफीसर<br>५) महाव्यवस्थापक जिल्हा उदयोग केंद्र<br>६) महिला महाविद्यालयाचे प्राचार्य<br>७) जिल्ह्यामधील महिला खासदार /आमदार<br>८) जिल्हा प्रसीध्दी अधिकारी<br>९) जिल्हा महिला आयोगाचे प्रतिनिधी<br>१०) स्थानिक महिला संस्थांचे प्रतिनिधी<br>११) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी<br>१२) महिला सुरक्षा क्षेत्रात आणि आर्थीक क्षेत्रात काम करणारी नामवंत व्यक्ती. | महिला घटक योजनेअंतर्गत राज्य शासन, केंद्र शासन आणि युनिसेफ पुरस्कृत योजनांचा आढावा घेणे. |

या समित्यांच्या कामकाजाचे अवलोकन करता समिती अध्यक्षांच्या कामाच्या व्यापामुळे समित्यांच्या नियमित बैठक घेतल्या जात नाही अथवा बैठक झाल्यास अधिनियमांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी जिल्हास्तरावर ठोस निर्णय होत नाही. तसेच समित्यांची संख्या जास्त असल्याने वेळेचा अपव्यय होतो. जिल्हास्तरावर समितीवर अशासकीय सदस्यांची निवड करतांना सामाजिक कार्यकर्त्यांच्या संख्येवर मर्यादा येते. सदर कार्यरत समित्यांचे अवलोकन करता बहुतेक समित्यांवर जिल्हाधिकारी हे अध्यक्ष म्हणून तर जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी हे सदस्य सचिव म्हणून कार्यरत आहे. इतर सदस्यांमध्ये जिल्हा पोलिस अधिक्षक आणि इतर जिल्हास्तरावरील प्रशासकीय अधिकारी यांचा समवेश समिती मध्ये करण्यात आला आहे. या समित्यांकडे महिलांच्या हक्कांचे संरक्षण, त्यांचे सक्षमीकरण आणि विकास या पध्दतीचे महत्वाचे कार्य आहे.

**शासन निर्णय :-** वरील सर्व समित्यांच्या कार्याचे अवलोकन करता जिल्हास्तरावर अधिनियमाची परिणामकारक अंमलबजावणी, पिडीत महिलांचे पुनर्वसन तसेच माहितीचे संकलन करणे, समाजात जनजागृती करणे यासर्व बाबींचा समावेश आहे. या सर्व समित्यांचे एकत्रिकरण केल्यास अधिनियमांची परिणामकारक अंमलबजावणी, विविध अधिनियमांतर्गत पिडीत महिलांचे पुनर्वसन, सामाजिक जनजागृती, माहितीचे संकलन, महिलांकरीता कार्यरत असणा-या विविध यंत्रणामध्ये समन्वय निर्माण करण्यास मदत होवू शकेल. त्या अनुषंगाने जिल्हास्तरावर सर्व समावेशक अशी एकच समिती गठीत करणे आावश्यक आहे, ज्यायोगे अधिनियमांच्या परिणामकारक अंमलबजावणी तसेच पिडित व्यक्तीना सहकार्य यासारख्या महत्वाच्या बाबींबाबत ठोस निर्णय जिल्हास्तरावर होवू शकतील. त्या अनुषंगाने प्रस्तावनेत नमूद केलेल्या जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली महिलासाठीचे सामाजिक कायदे आणि योजना अंमलबजावणीबाबत सर्व समित्या पुर्नरचित करण्यात येत असून खालीलप्रमाणे सर्वसमावेशक महिला जिल्हा सल्लागार समिती या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | | **समितीतील पद** |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य |
| ३. | प्रांत अधिकारी (सर्व) | सदस्य |
| ४. | जिल्हा पोलिस अधिक्षक | सदस्य |
| ५. | सभापती महिला व बाल कल्याण समिती | सदस्य |
| ६. | जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य |
| ७. | जिल्हा आरोग्य अधिकारी | सदस्य |
| ८. | जिल्हा उद्योग केंद्राचे अधिकारी | सदस्य |
| ९. | जिल्हा सरकारी वकील | सदस्य |
| १०. | जिल्हा समाजकल्याण अधिकारी | सदस्य |
| ११. | जिल्हा आदिवासी विकास अधिकारी | सदस्य |
| १२. | जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य |
| १३. | समाज कार्य महाविद्यालयाचे प्रतिनिधी | सदस्य |
| १४. | जिल्हा विधी सल्लागार मंडळ | सदस्य |
| १५. | नगरपरिषद /महानगरपालिकांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १६. | महिला आर्थिक विकास महामंडळाचे जिल्हा प्रतिनिधी | सदस्य |
| १७. | स्थानिक महिला संघटनांचे /संस्थांचे २ प्रतिनिधी | सदस्य |
| १८. | महिलांच्या कायद्यांच्या संदर्भात कार्यरत ५ अशासकीय महिला कार्यकर्ते | सदस्य |
| १९. | विशेष निमंत्रित | सदस्य |
| २०. | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | सदस्य सचिव |

(5)

२. **समितीचे कार्य** :- समितीचे कार्य खालीलप्रमाणे राहील :-

- महिलांसाठी वैयक्तिक व सामुहिक तसेच निवासी कार्यरत असणा-या जिल्हास्तरावरील सर्व विभांगांच्या राज्य व केंद्र पुरस्कृत योजनांचा आढावा घेणे तसेच महिलांकरीता केलेल्या आर्थिक नियोजनाची माहिती घेणे, महिला सक्षमीकरणासाठी कार्यक्रम निश्चित करुन त्यांच्या अंमलबजावणीबाबत पाठपुरावा करणे. या संदर्भात आढावा बैठकीसाठी संबंधित अधिका-यांनी सोबतच्या प्रपत्र - १ मध्ये माहिती सादर करणे आवश्यक राहील. (प्रपत्र - १)
- हुंडा पध्दतीच्या दुष्परीणामाबाबत वृत्तपत्र रेडीओ, दुरदर्शन, कार्यसत्र अभ्यास शिबीरे, पत्रक वाटप इत्यादी विविध प्रसार माध्यमांचा वापर करुन जनमत जागृत करणे. हुंडाबळी प्रकरणांचा आढावा घेवून उपाययोजना सुचविणे. या संदर्भात आढावा बैठकीसाठी संबंधित अधिका-यांनी सोबतच्या प्रपत्र - २ मध्ये माहिती सादर करणे आवश्यक राहील. (प्रपत्र -२)
- कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण अधिनियमाची परिणामकारक अंमलबजावणी करणे, संरक्षण अधिका-यांच्या कामकाजाचा आढावा घेणे, पिडित महिलांना योग्य ती मदत मिळवून देणे, जनजागृती व प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत केलेल्या कार्यवाहीचा आढावा व पिडित महिलांच्या अडचणीबाबत उपाययोजना सुचविणे. या संदर्भात आढावा बैठकीसाठी संबंधित अधिका-यांनी सोबतच्या प्रपत्र - ३ मध्ये माहिती सादर करणे आवश्यक राहील. (प्रपत्र - ३)
- अनैतिक व्यापार प्रतिबंध अधिनियमाच्या अंतर्गत सुटका करण्यात आलेल्या महिलांच्या पुनर्वसन व मायदेशी पाठविण्याच्या प्रक्रियेत सुसुत्रता आणण्यासाठी उपाययोजना सुचविणे, वेश्यागृहे बंद करण्यासाठी सहकार्य करणे, जिल्हयात प्रतिबंधात्मक योजना राबविण्यासाठी उपाययोजना करणे, अधिनियमांची परिणामकारक अंमलबजावणी होण्यासाठी केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेणे, जिल्हास्तरावर प्रशिक्षण कार्यक्रम राबविणे, प्रचार व प्रसिध्दीचा आढावा घेणे, गुन्हेगारांना शिक्षा होईल यासाठी संबंधितांना मार्गदर्शन करणे, विविध विभागातंर्गत समन्वय घडून आणणे. या संदर्भात आढावा बैठकीसाठी संबंधित अधिका-यांनी सोबतच्या प्रपत्र - ४ मध्ये माहिती सादर करणे आवश्यक राहील. (प्रपत्र - ४)
- महिला धोरण २००१ च्या अनुषंगाने विविध विभागाने जिल्हास्तरावर केलेल्या कार्यवाहींचा आढावा घेणे तसेच महिला आर्थिक विकास महामंडळाच्या कामकाजाचा आढावा घेणे तसेच त्यांच्याकडे नोंदणीकृत बचतगटाच्या कामकाजाचा आढावा घेणे. या संदर्भात आढावा बैठकीसाठी संबंधित अधिका-यांनी सोबतच्या प्रपंत्र - ५ मध्ये माहिती सादर करणे आवश्यक राहील. (प्रपत्र -५)

6

## ३. समितीच्या कामकाजाचे स्वरुपः-

- समितीची त्रैमासिक बैठक आयोजित करण्यात येईल (माहे - मे, ऑगस्ट, नोव्हेंबर, फेब्रुवारी )
- समिती सदस्य सचिव किमान ८ दिवस आधी बैठकीची पूर्व सूचना सदस्यांना देईल
- अशासकीय सदस्य निवडण्याचे सर्व अधिकार अध्यक्षास रहातील. समितीचे अध्यक्षांनी समितीवर अशासकीय सदस्यांची नियुक्ती त्वरीत करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.
- संबंधित विभागाकडून प्राप्त होणा-या माहितीचे विहित नमुन्यात संकलन करुन माहिती आणि बैठकीचे इतिवृत्त बैठकीच्या १० दिवसांचे आत शासनास तसेच महिला व बाल विकास आयुक्तालयास समितीचे सदस्य सचिव सादर करतील.

४. हुंडा पध्दती नष्ट करण्यासाठी जिल्हा दक्षता समिती या समिती शिवाय इतर ४ समित्यांना कोणत्याही प्रकारच्या खर्चाची तरतूद नाही. १९८५ पासून हुंडा पध्दती नष्ट करण्यासाठी जिल्हा दक्षता समितीसाठी फक्त रुपये ८३३३/- एवढीच तरतूद आहे. हीच तरतूद लक्षात घेवून पाच समित्यांचे एकत्रिकरण असल्यामुळे या एकत्रिकरणातून निर्माण होणाऱ्या एकाच जिल्हास्तरीय समितीस प्रभावी अंमलबजावणीसाठी व कामे योग्य तऱ्हेने पार पाडता यावे, याकरीता खालीलप्रमाणे वार्षिक निधी रुपये ४५,०००/- (रुपये पंचेचाळीस हजार फक्त) मंजूर करण्यात येत आहे.

| क्र | तपशील | प्रस्तावीत रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | समितीच्या वर्षातून होणा-या ४ बैठकांसाठी साधरणपणे १० अशासकीय सभासदांसाठी प्रवास खर्चासह बैठक भत्ता १० सदस्य x ४ बैठका xप्रत्यक बैठकीसाठी रुपये ५०० = ४० x५०० =रुपये २०,०००/- (यामध्ये प्रवास खर्च वेगळा व बैठक भत्ता वेगळा असे प्रस्तावित केलेले नाही. त्याऐवजी प्रवासखर्चासह एकत्रीत बैठक भत्ता देय राहील.) | २०,००० |
| २ | छपाई, भित्तीपत्रके, फोल्डर, प्रचार इत्यादीसाठी वार्षिक निधी | १०,००० |
| ३ | सांस्कृतिक कार्यक्रम, नाटयछटा, पथनाटय वर्षातून एकदा आयोजित करण्यासाठी | ०७,००० |
| ४ | चर्चासत्र, वादविवाद शिबीर आयोजन वर्षातून एकदा आयोजित करण्यासाठी | ०५,००० |
| ५ | लेखन सामग्री, टपाल खर्च, स्टेशनरी, यासाठी वार्षिक निधी | ०२,००० |
| ६ | किरकोळ खर्च एका बैठकीसाठी रुपये २५० प्रमाणे रुपये २५०x४ बैठका = रुपये १००० | ०१,००० |
| | **एका वर्षासाठी निधी एकूण रुपये** | **४५,०००** |

५. हुंडा पध्दती नष्ट करण्यासाठी जिल्हा दक्षता समितीस देण्यात येणारा निधी ज्या लेखाशिर्षाखाली खर्च करण्यात येतो तोच लेखाशिर्ष मागणी क्र. एक्स-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०३- महिला कल्याण (०८) हुंडा पध्दतीने निर्मुलन, (०८) (०१) महाराष्ट्र जिल्हापरिषदा व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८७ अन्वये हुंडा पध्दत नष्ट करण्यासाठी जिल्हापरिषदांना सहाय्यक अनुदान (कोषागारातून देय )

(२२३५१३८१), ३१-सहाय्यक अनुदान याखाली या एकत्रीकरण करुन निर्माण करावयाच्या जिल्हा स्तरीय समितीस प्रस्तावीत केलेला निधी खर्च करण्यात यावा.

६. यावरील खर्च आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी संबंधीत जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या वित्तीय तरतूदीतून उपरोक्त लेखाशिर्षाखाली भागवावा. सदरचा निधी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे अधिनस्त ठेवून त्यांनी या समितीचा निधी वेळोवेळी समितीचे अध्यक्ष यांची मान्यता घेवून खर्च करावा.

७. तसेच या संदर्भात शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मुसका-२०११/प्र.क्र.२७/का-१, दिनांक २५ जानेवारी, २०११ मधील सूचनांचे पालन करण्यात यावे.

८. सदर शासन वित्त विभागाचे अनौ. संदर्भ क्र. ५२५ /११ / व्यय-६, दिनांक २७.९.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(शं.शा.पढाळ)
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, मंत्रालयीन विभाग, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
पोलीस महासंचालक, पोलिस मुख्यालय, मुंबई.
समन्वयक, महिला व बालकांचे विशेष कक्ष, टाटा सामाजिक विज्ञान संस्था, देवनार, मुंबई.८८
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई
सचिव, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई.

आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
विशेष पोलीस महानिरिक्षक, महिला अत्याचार प्रतिबंधक कक्ष, गुन्हे अन्वेषण विभाग (गुन्हे),
संगमब्रिज, शिवाजीनगर, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११००५.
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
सर्व निबंधक, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर/औरंगाबाद.
सर्व जिल्हा न्यायाधिश, जिल्हा न्यायालय,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व प्रांत अधिकारी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा पोलिस अधिक्षक (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व सभापती महिला व बाल कल्याण समिती (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा उद्योग केंद्राचे अधिकारी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा सरकारी वकील (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा आदिवासी विकास अधिकारी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा माहिती अधिकारी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व समाज कार्य महाविद्यालयाचे प्रतिनिधी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा विधी सल्लागार मंडळ (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व नगरपरिषद /महानगरपालिकांचे प्रतिनिधी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व महिला आर्थिक विकास महामंडळाचे जिल्हा प्रतिनिधी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व स्थानिक महिला संघटनांचे /संस्थांचे २ प्रतिनिधी (संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व महिलांच्या कायद्यांच्या संदर्भात कार्यरत ५ अशासकीय महिला कार्यकर्ते(संबधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या मार्फत)
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
राज्य समन्वयक (PPMU), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधिक्षक, राज्य गृहे (सर्व) (आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचेमार्फत)
सर्व समुपदेशन केंद्र /सेवा पुरविणारे-(Service Provider), इ. (महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील) (आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचेमार्फत)

## (प्रपत्र -१)

**महिलांसाठी वैयक्तीक व सामुहिक तसेच निवासी कार्यरत असणा-या जिल्हास्तरावरील सर्व विभांगांच्या राज्य व केंद्र पुरस्कृत योजनां तसेच महिलांकरीता केलेल्या नियोजनाची माहिती, महिला सक्षमीकरणासाठी कार्यक्रम या बाबतचा तपशील**

**जिल्हा ---------------------------------**

| अक्र | योजना | | | | | | महिला सक्षमीकरणासाठी निश्चित केलेली धोरणे | | महिला सक्षमीकरणासाठी आयोजित करण्यात आलेले कार्यक्रम | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | विभागाचे नांव | योजनेचे नांव | योजनेचा प्रकार वैयक्तीक /सामुहिक /निवासी | आर्थिक तरतूद | लाभार्थी संख्या | जिल्हास्तरावर महिलांना केंद्रस्थानी मानुन केलेली आर्थिक तरतूद | धोरण | आर्थिक तरतूद | कार्यक्रमाचे नांव | सहभागी संख्या |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |

## (प्रपत्र -२)

**हुंडा पध्दतीच्या विरोधात जनजागृती व सहाय्यासंबंधाने करण्यात आलेली कार्यवाही**

**जिल्हा -------------------------------**

| हुंडा पध्दतीच्या दुष्परीणामाबाबत जनजागृती | | | | | | | | | हुंडा विषयक माहिती | | | | हुंडा प्रतिबंधक अधिकारी यांनी केलेली कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वृत्तपत्र | रेडीओ | दुरदर्शन | अभ्यास शिबीरे | पत्रक वाटप | कलापथक | पथनाटये | सभा | प्रदर्शने | किती महिलांना कायदेविषयक मदत मिळवून देण्यात आली | महिलांवर होणा-या अत्याचारांवर पायबंद घालण्यासाठी व पुनरावृत्ती टाळण्यासाठी सुचविलेल्या मार्गदर्शक सुचना | जिल्हयातील हुंडा बळींची संख्या | करण्यात आलेली कारवाई | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |